**प्रशासकीय मान्यता :**

सन २०१९-२० या आर्थिक वर्षात पदव्युत्तर अभ्यासक्रमाच्या श्रेणीवर्धनासाठी केंद्र शासन हिस्सा अंतर्गत प्राप्त अनुदानातून यंत्रसामुग्री खरेदीस प्रशासकीय मान्यता.

श्री.वसंतराव नाईक शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, यवतमाळ.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : व्हीसीवाय -२०२०/प्र.क्र.१२४/प्रशा-१**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक : १८ मार्च, २०२०

**वाचा :**
१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक ०७.०३.२०१८.
४) संचालक वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र : संवैशिवसं/शावैमय/केंद्रशासनहिस्सा (४२१० २४३८)/यंसाख/२९२५/१-म /२०२०, दिनांक : १४.०२.२०२०
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.संकीर्ण २०१९/प्र.क्र.४/२०/कोषा.प्रशा.५, दिनांक ३०.०१.२०२०

**शासन निर्णय :-**

श्री.वसंतराव नाईक शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, यवतमाळ या संस्थेस केंद्र शासनाच्या ११ व्या पंचवार्षिक योजनेंतर्गत पदव्युत्तर अभ्यासक्रमाच्या श्रेणीवर्धन योजनेंतर्गत केंद्र शासन हिस्साअंतर्गत मंजूर अनुदानातून रुपये १,८१,९३,०००/-(रुपये एक कोटी एक्याऐंशी लक्ष त्र्यान्नव हजार फक्त) इतक्या रक्कमेची यंत्रसामुग्री खरेदी करण्यास या शासननिर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र | यंत्राचे नांव | नग | नग किंमत (रुपये) | एकूण किंमत (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | ॲडव्हान्स्ड् लॅप्रोस्कोपी सिस्टीम आयसीजी टेक्नॉलॉजी | १ | ४३,००,००० | ४३,००,००० |

| अ.क्र | यंत्राचे नांव | नग | नग किंमत (रुपये) | एकूण किंमत (रुपये) |
|---|---|---|---|---|
| २ | ॲटोमेटेड एचपीटीएलसी सिस्टीम फॉर थालमेसीया ॲण्ड हिमोग्लोबीनोपॅथी टेस्टींग ॲण्ड स्क्रिनिंग | १ | ४०,२५,००० | ४०,२५,००० |
| ३ | फुल्ली ॲटोमेटेड बायोकेमिस्ट्री ॲनालायझर | २ | १२,५०,००० | २५,००,००० |
| ४ | कॉम्पुटर असिस्टेड सिमेन ॲनालायझर सिस्टीम | १ | १७,९५,००० | १७,९५,००० |
| ५ | एल.ई.डी. ओ.टी. लाईट विथ एच.डी.कॅमेरा | १ | १७,००,००० | १७,००,००० |
| ६ | पेडियाट्रिक फ्लेक्झिबल ब्रॉन्कोस्कोप विथ लाईट सोर्स | १ | १०,११,००० | १०,११,००० |
| ७ | ग्रॉसिंग स्टेशन | १ | ८,५०,००० | ८,५०,००० |
| ८ | वॅक (व्हीएसी) सेट विथ ॲक्सेसरीज | १ | ७,००,००० | ७,००,००० |
| ९ | बायनाक्युलर रिसर्च मायक्रोस्कोप | १७ | ३६,००० | ६,१२,००० |
| १० | ट्रायनाक्युलर हेड मायक्रोस्कोप विथ ब्राईट फिल्ड/ फ्लोरोसेन्ट फोटोग्राफी | १ | ३,५०,००० | ३,५०,००० |
| ११ | ड्रिल मशीन | १ | ३,५०,००० | ३,५०,००० |
| | | एकूण | | १,८१,९३,००० |

**अटी :-**

१. सदर प्रशासकीय मान्यता संबंधित केंद्र हिस्सा योजनेंतर्गत मंजूर अनुदानातून प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर यंत्रसामुग्री हाताळणीसाठी नव्याने पदनिर्मितीची आवश्यकता नाही, याबाबत संचालनालयाने व संबंधित अधिष्ठाता यांनी खातरजमा करावी.

३. सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ मध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

४. सदर यंत्रसामुग्री खरेदी विषयक प्रक्रिया "औषधे, तद्अनुषंगीक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे या बाबींची खरेदी हाफकिन बायो-फामास्युटीकल्स कॉपोरेशन लि. मार्फत करण्याबाबत" निर्गमित शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करावी.

५. सदर यंत्रसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री संचालक (वै.शि.) तसेच संबंधित अधिष्ठाता यांनी करावी.

६. सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार यंत्रपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे संचालक (वै.शि.) यांनी प्रमाणित करावे.

७. प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भुत केलेला नसल्याबाबत व सदर यंत्रसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत संचालकांनी खात्री करावी.

८. मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

९. सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली मंजुर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०.उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे खरेदी समितीने अनुपालन करावे. सदर तरतूदीचे अनुपालन केलेल्या यंत्राच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

२. या प्रयोजनासाठी येणारा खर्च संबंधित संस्थेस खालील लेखाशिर्षातंर्गत मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक - एस ४

| | | |
|---|---|---|
| ४२१० | - | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च |
| ०३ | - | वैद्यकीय शिक्षण व प्रशिक्षण संशोधन |
| १०५ | - | विषमचिकित्सा |
| (००) (४२) | - | राज्य शासकीय वैद्यक महाविद्यालयाचे बळकटीकरण व दर्जावाढ करणे व नवीन पदव्युत्तर पाठयक्रम सुरु करणे व पदव्युत्तर विद्यार्थ्यांच्या संख्येत वाढ करणे (४२१० २४३८) |
| ५२ | - | यंत्रसामुग्री व साधनसामुग्री |

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३१८१४५५४११५१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN
MURLIDHAR
RAO DAHALE

Digitally signed by ARUN MURLIDHARRAO DAHALE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b22
44d66593f50dd713da83860912503,
postalCode=400032, street=MANTRALAYA ,MUMBAI,
serialNumber=30df743755280cf26ce97ec0978235f6
3f80f0bc4317129bf381eb48778f2e3d, ou=NA,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARUN
MURLIDHARRAO DAHALE
Date: 2020.03.18 17:06:33 +05'30'

( अ. मु. डहाळे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार - २ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर.
२. व्यवस्थापकीय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि., मुंबई.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
४. अधिष्ठाता, श्री.वसंतराव नाईक शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, यवतमाळ .
५. कक्ष अधिकारी (कोषा-प्रशा-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ.
७. निवडनस्ती (प्रशा-१).